महाराष्ट्र नागरी सेवा [सेवेच्या सर्वसाधारण शर्ती] नियम, १९८१ च्या नियम ३८ खालील सूचना क्र. १ व २ नुसार कार्यवाही करण्या-बाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:जन्मदि-१०९२/प्र.क्र.६१/९२/[१]/१३-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २७ सप्टेंबर, १९९५.

# प रि प त्र क

शासकीय कर्मचा-यांची सेवा सुरु झाल्यानंतर सेवापुस्तिकेत जन्मतारीख नोंदविताना कोणती जन्मतारीख नोंदविण्यात यावी याबंधीची तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा [सेवेच्या सर्वसाधारण शर्ती] नियम १९८१ च्या नियम ३८ [२] मध्ये केली आहे. या नियमानुसार जन्मदिनांक कागदोपत्री पुराव्यावरुन पडताळून पहाण्यात यावा अशी तरतूद आहे. नियम ३८ [२] खालील सूचना क्रमांक १ मध्ये एकदा नोंदलेल्या जन्मतारखेमध्ये बदल करण्यासंबंधीची विनंती सर्वसाधारण ५ वर्षानंतर विचारात घेण्यात येऊ नये अशी तरतूद आहे. सूचना क्र. २ मध्ये अचूक जन्मतारीख नोंदण्यासाठी कोणता कागदोपत्री पुरावा ग्राह्य मानावा अशी तरतूद आहे. सूचना क्र. ३ मध्ये राजपत्रित अधिका-यांच्या बाबतीत व ५ वर्षानंतर प्राप्त झालेल्या अराजपत्रित कर्मचा-यांच्या विनंतीबाबत कोणती कार्यवाही करावी याची तरतूद आहे. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, नियम ३८ [२] नुसार सेवापुस्तकात जन्मतारीख नोंदविताना सूचना क्रमांक २ मध्ये उल्लेख केलेले कागदोपत्री पुरावे तपासून जन्मतारीख निश्चित न करता शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्रात किंवा शालांत परीक्षा प्रमाणपत्रामध्ये नोंदविलेली जन्मतारीख सेवापुस्तकात नोंदविण्यात येते व नंतर सेवासमाप्तीच्या टप्प्यावर जन्मदिनांक बदलण्याचे प्रस्ताव येतात. वास्तविक पहाता ज्यावेळी शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्रात किंवा शालांत परीक्षा प्रमाणपत्रात दिलेली जन्मतारीख व जन्म-मृत्यू नोंदवहीत नोंदलेली जन्मतारीख भिन्न असेल त्यावेळी जन्म-मृत्यू नोंदवहीत नोंदविलेली जन्मतारीख नियमानुसार स्विकारणे आवश्यक आहे. परंतु हा पुरावा ज्या कर्मचा-यांचे मूळ जन्म-मृत्यू नोंदवहीत नाव असेल व ही नोंद जन्माच्या वेळी घेतली असेल त्यांच्या बाबतीत ग्राह्य मानावा लागेल अन्यथा शाळा सोडल्याच्या दाखल्यातील किंवा शालांत परीक्षा प्रमाणपत्रात नोंद केलेली जन्मतारीख ग्राह्य मानणे आवश्यक आहे. जन्म-मृत्यू

GR200404061843420001-0100

कृ. उ. प.

नोंदवहीतील उतारा तपासताना ही नोंद मुलतःच घेण्यात आली आहे याची खात्री करुन घेण्यात यावी.

शासकीय सेवेत प्रवेश केल्यावर लक्षणीय अशा विलंबाने प्राप्त झालेल्या जन्मतारीख बदल करण्याचा प्रस्ताव स्वीकारण्यापूर्वी सर्व कागदपत्रांच्या व कर्मचा-यांच्या शाळेतील जन्मदिनांकाची तपासणी करुन मगच जन्मदिनांक निश्चित करावा. हा जन्मदिनांक निश्चित करताना त्याला शाळेत किंवा शासकीय सेवेत प्रवेश मिळण्यासाठी फायदा मिळाला नाही ना याची खात्री करुन घ्यावी. अशा पध्दतीने जन्मदिनांक नोंदविल्यानंतर कर्मचा-याला सेवाकालावधीत जन्मदिनांक बदल करण्याची संधी राहणार नाही याचीसुध्दा कल्पना देण्यात यावी.

सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक अधिका--यांनी त्यांच्या नियमित तपासणीच्यावेळी सेवापुस्तिकेत नोंदविलेल्या नोंदी देखील त्या आदेशानुसार नियमानुसार केल्या आहेत/नाही याची तपासणी करावी व चुकीच्या जन्म-दिनांकाच्या नोंदी असल्या तर त्या दुरुस्त करण्याबाबत नियमानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधित अधिका-यांना द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

[ अ. म. मंडपे ]

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,

x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

x प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,

x प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

x प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

सर्व विभागीय आयुक्त,

मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई